मा.मुख्यमंत्री सचिवालयाकरिता संगणक, प्रिंटर व स्कॅनर खरेदीसाठी पुरवठा आदेश देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसटीवाय-२०२५/प्र.क्र.०७/मंआस्था-२(२१-अ)
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक :- १८ मार्च, २०२५.

संदर्भ- १) प्रकल्प अंमलबजावणी समितीचे बैठकीचे इतिवृत्त समक्रमांक दिनांक १३/०२/२०२५.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक- एसटीवाय-२०२५/ प्र.क्र.०७/ मंआस्था-२ (२१-अ), दि.१३/०२/२०२५.

**प्रस्तावना:-**

मा.मुख्यमंत्री सचिवालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी संगणक, प्रिंटर व स्कॅनर याबाबतची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवर ऑनलाईन निविदाव्दारे करण्यास संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णय अन्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेसवर (GeM) दिनांक १४/०२/२०२५ रोजी ऑनलाईन निविदा ११ दिवसाचा कालावधी देवून तसेच याबाबतची सूचना एक विभागीय स्तरावरील व राज्य स्तरावरील तसेच शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आली. त्यानुसार प्राप्त झालेल्या निविदाची तांत्रिक व व्यावसायिक छाननी केल्यानंतर पात्र एल-१ निविदाकाराची निविदा स्विकारण्याची व पुरवठा आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवर प्रसिध्द करण्यात आलेल्या निविदाची विभागीय खरेदी समितीव्दारे तांत्रिक व व्यावसायिक छाननी अंती ARITHMETIC SYSTEMS AND TECHONOLOGIES यांची निविदा एल-१ असल्यामुळे सदर निविदा स्वीकारण्यात येऊन पुढीलप्रमाणे वस्तुंचा पुरवठा करण्यासाठी त्यांना सदर पुरवठा आदेश देण्यात येत आहे. याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ क्र | वस्तुचे नाव | एकूण संख्या | एल-१ नुसार प्रती नग दर (GST सह) | एकूण रक्कम (GST सह) |
|---|---|---|---|---|
| 1 | Multifunction Machine MFM (V2) HP Black and white duplex printer MFP329 | 46 | 41,654 | 19,16,084 |
| 2 | Multifunction Machine MFM (V2) HP all in one colour printer Smart Tank 790 | 9 | 32,898 | 2,96,082 |
| 3 | All in one pc (V2) HP i7 | 65 | 1,19,829 | 77,88,885 |
| 4 | All in one pc (V2) HP i5 | 7 | 80,376 | 5,62,632 |
| 5 | HP Scanner (V2) 5000 S5 | 18 | 70,350 | 12,66,300 |
| | | | एकूण रक्कम | 1,18,29,983 |

२. सदर पुरवठा आदेशा संबंधित अटी व शर्ती पुढीलप्रमाणे आहेत.

२.१. वरीलप्रमाणे वस्तुंची शासनास तातडीने आवश्यकता असल्यामुळे गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवर याबाबतची मागणी नोंदविल्यानंतर पुरवठादारास सात कामकाजाच्या दिवसांत पुरवठा करणे बंधनकारक राहिल.

२.२ पुरवठादारास शासनाने विहित केलेल्या विनिर्देश (Specification) प्रमाणे पुरवठा करणे आवश्यक राहील. विनिर्देश (Specification) प्रमाणे वस्तु नसेल व वस्तुमध्ये काही बिघाड असेल तर वस्तु बदलून देण्याची जबाबदारी कोणत्याही आकाराशिवाय पुरवठादाराची राहील.

२.३ पुरविण्यात आलेली वस्तु सुस्थितीत व विनिर्देश (Specification) प्रमाणे असल्याची खात्री केल्यानंतर देयक अदा करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

२.४ सर्व वस्तुंचे शासनाने दिलेले विनिर्देश (Specification) इन बिल्ट असावे. त्यामध्ये निविदाकराने कोणतीही छेडछाड/सुधारणा (modification) करु नये तसेच याबाबतचे हमीपत्र निविदाकारास दयावे लागेल.

२.५ पुरवठा केलेल्या वस्तुचा मॉडेल क्रमांक व विनिर्देश (Specification) ची प्रत पुरवठा करताना डिलीव्हरी चलन सोबत सादर करावी.

२.६ पुरवठादारास पुरवठा आदेशाच्या ३ टक्के अनामत रक्कम संगणकासाठी ५ वर्ष तसेच प्रिंटर व स्कॅनरसाठी ३ वर्ष या वॉरंटी कालावधीसाठी बँक गॅरंटीस्वरुपात आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत सादर करावे लागेल.

२.७ पुरविण्यात येणारे साहित्य २०२४ पूर्वी लॉँच केलेले नसावे.तसेच सर्व हार्डवेअर नवीन व ब्रॅन्डेड असणे आवश्यक आहे.

२.८ वॉरंटी कालावधीत देखभाल व दुरुस्तीबाबतची हमी (विना खर्च) निविदाकारास दयावी लागेल.

३. सदरचा खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र.ए-१, २०१३- मंत्री परिषद, (८००) इतर खर्च,(००)(०१) इतर खर्च (अनिवार्य) (२०१३००५३) १७- संगणक खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर मान्यता शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, भाग पहिला, उपविभाग-२,अ.क्र.२७-अ नियम क्र.७६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकात देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१८१४३३०१०८०७ असा आहे. डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEVIDAS SANDUJI BHAGURE

Digitally signed by DEVIDAS SANDUJI BHAGURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=0990ae5e49835c85a735703503a82e3cd3cdde019c8ce2fdb9c7765ef1b7c39f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D19FEFD30011466572B4E69158C3099ADDED4CBB59D6833F72ED93F73A564DC, cn=DEVIDAS SANDUJI BHAGURE
Date: 2025.03.18 14:35:53 +05'30'

**( दे. सां. भगुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** मे. अर्थमॅटिक सिस्टीम्स ॲन्ड टेकनोलॉजीस प्रा.लि.१३०३, सदाशिव पेठ, खुण्या मारुती मंदिर जवळ, पुणे-४११०३०

**प्रत:-**

१) महालेखापाल,(लेखा परिक्षक-१) मुंबई
२) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता-१) मुंबई,

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (सा.प्र.वि. कार्या.मंआस्था-३-रोख शाखेमार्फत)
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५) सह/उप सचिव (प्रशासन), मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
६) अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सा.प्र.वि. रोख शाखा
७) निवड नस्ती, कार्या.मंआस्था-२